पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत
राबविण्यात येणा-या ग्रामीण नळ पाणी पुरवठा
योजनांच्या पाणी आरक्षणाबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो १११८/प्र.क्र.१९/पापु-०७**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, ७ वा मजला
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ८ ऑगस्ट, २०१८

**वाचा**

१) **शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७,दिनांक ०७ मे,२०१६.**
२) **शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१७/प्र.क्र. ९१/पापु १९, दिनांक १६ सप्टेंबर,२०१७.**
३) **शासन निर्णय क्रमांकः बिसिंआ २०१७/(३५५/१७)/सिं.व्य.(धो),दिनांक ३० जानेवारी, २०१८.**

**प्रस्तावना**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी जलसंपदा विभागाच्या अखत्यारीतील पाणी साठयांचे स्रोत म्हणून वापर करावयाचा असल्यास, त्याकरिता सदर विभागाकडील पाणी आरक्षणाच्या मंजूरीची आवश्यकता राहणार नाही असा निर्णय मंत्रिमंडळाच्या दि.१६.५.२०१७ च्या बैठकीत घेण्यात आला होता. या निर्णयाच्या अनुषंगाने विभागाकडून दि.१६.९.२०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. सदर दि.१६.९.२०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदी या मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमातील ज्या योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविल्या जातात, केवळ अशाच योजनांना लागू आहेत. त्यामुळे या विभागामार्फत जलस्वराज्य-२, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/ जिल्हा परिषदांमार्फत घेण्यात येणारे प्रकल्प तसेच मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषदांमार्फत राबविण्यात येणा-या नळ पाणी पुरवठा योजनांसाठी सुध्दा पाणी आरक्षणाच्या पूर्व मंजूरीची आवश्यकता नसावी, असा निर्णय मंत्रिमंडळाच्या दि. १९.०७.२०१८ रोजीच्या बैठकीत घेण्यात आला आहे. मंत्रीमंडळाच्या उक्त निर्णयास अनुसरुन आवश्यक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत राबविण्यात येणा-या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जलस्वराज व मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमाकरिता जलसंपदा विभागाच्या अखत्यारीतील पाणी साठयांचा स्रोत म्हणून वापर करावयाचा असल्यास, त्याकरिता जलसंपदा विभागाकडील पाणी आरक्षणाच्या पूर्वमंजुरीची आवश्यकता राहणार नाही, असा निर्णय घेण्यात आला आहे.

सदर शासन निर्णय मंत्रीमंडळाच्या दिनांक १९.०७.२०१८ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन, तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १९५/२०१८ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०८१८०३३५६५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashwant Tedgya Padvi

Digitally signed by Yashwant Tedgya Padvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42f023d235c1f55c387492762e66530fd58085d2893f88445cf00fc7709a8080, serialNumber=c96ec3b84dfb89ca1fbee688d0dbc9e15c61e7e091602f1cc5c94657fc4d9c86, cn=Yashwant Tedgya Padvi
Date: 2018.08.09 11:33:25 +05'30'

( य.टे.पाडवी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री/राज्यमंत्री (सर्व), मंत्रालय, मुंबई.
४. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई.
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६. मा.विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व), विधानभवन, मुंबई.
७. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय मुंबई.
९. प्रधान सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
१२. संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट,पुणे.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई, नागपूर.
१५. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व),
१६. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व),
१७. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१८. उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवड नस्ती (पापु-०७)